**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन ज्ञापन क्र. सीआरपी-१११५/प्र.क्र.५४१ (भाग-३)/पोल-७**

२ रा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक १० जानेवारी २०१७.

**विषय** :- सशस्त्र दूरक्षेत्र, तुमरकोडी, ता. भामरागड, जि. गडचिरोली याच्या इमारतीच्या बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
1) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं २१-अ/१९५/नवीन-पो.ठा. (८०:२० स्कीम)/१४७/२०१५, दिनांक १३.०१.२०१६.
2) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं २७-ब/२८-ब-२/गडचिरोली-A.O.P. बांध. / ३४१/२०१६, दिनांक २९.१२.२०१६.
3) पोलीस महासंचालक यांचे अर्ध-शासकीय पत्र क्र. पोमसं/२६ अ/गडचिरोली-प्रस्ताव/२०१६/१७१, दिनांक ३०.१२.२०१६.

**ज्ञापन**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या दिनांक १३.०१.२०१६ रोजीच्या संदर्भाधीन पत्राद्वारे सशस्त्र दूरक्षेत्र, तुमरकोडी, ता. भामरागड, जि. गडचिरोली याच्या इमारतीच्या बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत प्रस्ताव सादर करण्यात आला आहे.

२. उक्त कामासाठी मे. धावड ॲण्ड असोशिएट्स, नागपूर, या संमंत्रक वास्तुशास्त्रज्ञ (consulting architects) संस्थेने सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१४-१५ या वर्षीच्या दरसूचीवर आधारित रु.२,९७,१४,४०५/- इतक्या खर्चाचे अंदाज व नकाशा तयार केले असून ते उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, गडचिरोली, यांचे कार्यालय, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले असून उक्त प्रस्तावाला प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे. त्या अनुसार सशस्त्र दूरक्षेत्र, तुमरकोडी, ता. भामरागड, जि. गडचिरोली याच्या इमारतीच्या बांधकामासाठी रु.२,९७,१४,४०५/- इतक्या खर्चाच्या अंदाजास, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. ही मान्यता वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच, अनुक्रमांक १, अन्वये प्रशासनिक विभाग या नात्याने गृह विभागास प्राप्त प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करत प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा लेखाशीर्ष ४०५५, पोलीस यावरील भांडवली खर्च, उपशीर्ष, २०७, राज्य पोलीस, अंतर्गत (००)(०१), नक्षलविरोधी कार्यक्रम-कार्यालय इमारतीचे बांधकाम, या उद्दिष्टाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६७/इमा-२, दिनांक १६.०२.२०१६, द्वारे दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११०१२३४०१२०२९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.01.10 12:38:06 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक,
महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत:-**

१) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई (अनौपचारिक संदर्भ क्र.६७/इमा-२, दिनांक १६.०२.२०१६, च्या संदर्भात).
२) पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, गडचिरोली.
३) पोलीस अधीक्षक, गडचिरोली.
४) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, गडचिरोली.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
६) महा लेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, मुंबई.
७) उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, यांचे कार्यालय, गडचिरोली.
८) कार्यासन अधिकारी (व्यय-७/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवड फाईल (पोल-७).